वन विभागातील संगणकीकरणाच्या
अंमलबजावणीसाठी निधी अभिहस्तांकित
करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय, क्रमांकः मातंस/२०११ /प्र.क्र.३१५/३९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः ०४/११/२०११
वाचावेः शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एमएमसी - २००४/प्र. क्र.२१/फ-२
दि. ०५.१०.२०११

**प्रस्तावना:-**

वन विभागातील संगणकीकरणाच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तसेच सुसूत्रीकरणासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. ३०/०८/२०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये निर्णय घेतल्यानुसार सदर प्रकल्पासाठी येणाऱ्या एकूण रु. २५.०७ कोटी अपेक्षित खर्चापैकी रु. ४.०० कोटी इतक्या रकमेची तरतुद माहिती तंत्रज्ञान विभागाकडील निधीमधुन उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

**शासन निर्णय:-**

१. वन विभागातील संगणकीकरणाच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तसेच सुसूत्रीकरणासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. ३०/०८/२०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये निर्णय घेतल्यानुसार सदर प्रकल्पासाठी येणाऱ्या एकुण रु. २५.०७ कोटी अपेक्षित खर्चापैकी रु. ४.०० कोटी इतक्या रकमेची तरतुद माहिती तंत्रज्ञान विभागाकडील निधीमधुन उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

२. त्यानुसार वन विभागास एकुण रु. ४,००,००,०००/- इतका निधी अभिहस्तांकित करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे अभिहस्तांकित करण्यात येणाऱ्या निधीचा वापर संगणकीकरणाच्या बाबींसाठीच खर्च करण्यात यावा व खर्चाच्या विनियोगाचा अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे पाठविण्यात यावा. सदर निधी प्रत्यक्ष खर्च करताना सामान्या प्रशासन विभाग व वित्त विभाग यांच्या प्रचलित नियम तसेच वित्तीय नियम व विहित तरतुदी यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदरहू प्रयोजनावरील होणारा खर्च हा मागणी क्र. ए-४, २०५२, सेक्रेटरीएट सर्वसाधारण सेवा (००) (०९) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, योजनेत्तर (२०५२ ५०७२) ( १७ ) संगणक खर्च, या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो वित्तीय वर्ष सन २०११-२०१२ साठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर तरतुद ही चालु आर्थिक वर्षातच खर्च करण्यात यावी.

६. खर्च करण्यात आलेल्या रकमेचे कोषागार प्रमाणक क्रमांक, दिनांक व रक्कम याप्रमाणे अनुपालन अहवाल विभागाने माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे दि. ३१/०३/२०१२ पर्यंत सादर करावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र १०.८/ प्र.क्र.७०/ विनिमय, दि. १५ मे, २००९ भाग पहिला उपविभाग दोन मधील अनु क्र. २८ ब नियम क्र. ७६ नुसार विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक क्रमांक २०१११११०४१३०४५४००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**( सु. ह. जाधव )**
**उपसचिव ( मातं )**

प्रति,

१) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई ( २ प्रती )
२) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर ( २ प्रती )
३) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई ( २ प्रती )
४) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र- २, नागपूर ( २ प्रती )
५) प्रधान सचिव (वने) महसुल व वन विभाग, मंत्रालय मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) अवर सचिव, वित्त विभाग ( अर्थ १३ व व्यय - ४)
९) कक्ष अधिकारी, साप्रवि कार्या क्र. २५
१०) रोख शाखा ( मातंसं - ३९)
११) निवड नस्ती, कार्यासन - ३९